**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण )**
**अधिनियम,१९९५ नुसार कृषि व पदुम विभाग (खुद्द)**
**मधील सरळसेवा शिपाई व वाहनचालक पदावर**
**शारीरिकदृष्ट्या अपंगांसाठी अरक्षण विहित करणे/सूट देणे**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**क्रमांक-कृपवि- १६११/प्र.क्र.६६/प्रशा-१**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २८ जानेवारी,२०११**

वाचा:- १.अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचेसंरक्षण)अधिनियम,१९९५ (क्र.१/१९९६),
२. शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.-एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.१२/१६-अ, दिनांक २ मे,१९९८,
३. शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र-आस्था-११०३/प्र.क्र.१२२/०३/१९, दिनांक ४ मार्च,२००४
४. शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र-आस्था-११०६/प्र.क्र.३४०/२००६/१९, दिनांक १४ जुलै,२००८
५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार-३, दिनांक ३ ऑगस्ट,२०१०.

प्रस्तावना :

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम,१९९५ (१९९६ चा क्र.१) हा अधिनियम दिनांक ७ फेब्रुवारी,१९९६ पासून लागू झाला आहे. या अधिनियमास अनुसरुन शासनाने संदर्भ क्र.२ येथिल दिनांक २ मे,१९९८ च्या शासन परिपत्रकान्वये शासन सेवेत अंध / अल्पदृष्टी, कर्णबधिर (श्रवणदोष), अस्थिव्यंग या प्रवर्गात समाविष्ट होणाऱ्या अपग व्यक्तींना सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्याबाबतच्या सूचना सर्व प्रशासकीय विभागांना दिल्या आहेत. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम,१९९५मधील तरतुदींस अनुसरुन केंद्र शासनाने त्यांच्या अखत्यारितील आस्थापनेवरील अपंग व्यक्तिंसाठी पदे निश्चित करुन त्यांची यादी प्रसिध्द केली आहे. सदर यादीनुसार विभागाच्या आस्थापनेवरील जी पदे समान आहेत ती पदे अपंगांसाठी निश्चित करुन तसे आदेश निर्गमित करावेत अशा सूचना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने दिनांक ३ ऑगस्ट,२०१० च्या शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार व सामाजिक न्याय विभागाच्या संदर्भ-५ वरील शासन निर्णयातील सुचनांना अनुसरुन कृषि व पदुम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील गट "ड" मधील शिपाई संवर्गातील पदे अपंग आरक्षणाच्या दृष्टीने सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम,१९९५ च्या कलम ३२ व ३३ नुसार कृषि व पदुम विभागाच्या आस्थापनेवरील गट "ड" मधील शिपाई या संवर्गाकरिता सरळसेवा भरतीसाठी शारिरीक दृष्ट्या अपंग प्रवर्गासाठी ३ % आरक्षण लागु राहिल. अपंग आरक्षणासाठी सदर प्रवर्गातील पुढीलप्रमाणे पदे सुनिश्चित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अंध /अल्पदृष्टी | आरक्षण टक्केवारी | कर्णबधिर | आरक्षण टक्केवारी | अस्थिव्यंग | आरक्षण टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | शिपाई | पात्र<br>* B, LV | १ % | पात्र<br>HH | १ % | पात्र<br>OL | १ % |

* B -- Blind (अंध), LV -- Low vision (अल्पदृष्टी)
* HH-- Hearing Handicap (कर्णबधिर / श्रवण दोष)
* OL-- One Leg (अस्थिव्यंग)

३. अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम,१९९५ नुसार अपंग व्यक्तींसाठी विभागाच्या आस्थापनेवर आरक्षित असलेल्या पदांवर नियुक्तीसाठी संबंधीत उमेदवाराने विहित प्राधिकाऱ्याचे सोबत जोडलेल्या नमुन्यातील प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहील. तसेच सेवाप्रवेश नियमानुसार विहित करण्यात आलेली अर्हता उमेदवाराने धारण करणे बंधनकारक राहील.शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क.अपंग-१००९/प्र.क्र.२७६/०९/१६-अ, दिनांक १९ मार्च,२०१० मधील तरतुदीनुसार अपंगांची आरक्षित पदे सरळसेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता ती स्वतंत्रपणे दर्शविण्यात येऊन निवड झालेल्या अपंग उमेदवारांना ते ज्या सामाजिक प्रवर्गातील असतील त्या प्रवर्गात समांतर आरक्षण म्हणून सामावून घेण्यात येईल

४. गट "क" मधील "वाहनचालक" या पदाची कर्तव्ये व जबाबदारी लक्षात घेता, "वाहनचालक" या पदास अपंग प्रवर्गाचे आरक्षण लागू करण्यापासून सूट देण्यात येत आहे.

५. कृषि व पदुम विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील शिपाई संवर्गातुन गट "क" मधील लिपीक संवर्गातील पदोन्नती कोट्यातील २५ % पदांसाठी सामान्य प्रशासन विभागाने लिपीक संवर्गासाठी निश्चित केल्यानुसार अपंग आरक्षण लागु राहील.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०१२८१९३०२९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
(ध.कु.राठोड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सामान्य प्रशासन विभागातील अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
आयुक्त, अपंग कल्याण,३, चर्च रोड,पुणे
मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहायक,
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्या.क्र.१६-अ, मंत्रालय,मुंबई
उप सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / सुधार-३, मंत्रालय,मुंबई
कृषि व पदुम विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव / कक्ष अधिकारी, मंत्रालय,मुंबई.